**अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक व अमरावती यांच्या कार्यक्षेत्रातील शासकीय आश्रमशाळांच्या दुरुस्तीच्या अंदाजपत्रके व आराखड्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत....**

**महाराष्ट्र शासन**

शासन निर्णय क्रमांक : शाआदु-२००९/प्र.क्र.११४/का.१३
आदिवासी विकास विभाग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ४ जुलै, २००९.

__वाचा :__ आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांचे पत्र क्रमांक इमा-२००९/ प्र.क्र.१०/ का.८(३), दिनांक १५ एप्रिल, २००९.

__**शासन निर्णय :**__ आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांनी त्यांच्या दि.१५/४/२००९ च्या पत्रान्वये अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक व अमरावती यांचे कार्यक्षेत्रातील शासकीय आश्रमशाळा, भिलमाळ, ता.त्र्यंबकेश्वर जि.नाशिक, भिलवाड, ता.सटाणा, जि.नाशिक व बोथी, ता.कळमनुरी, जि.हिंगोली येथील दुरुस्ती करण्याकरिता एकूण रु.३३,५७,३३०/- रक्कमेची अंदाजपत्रक व आराखडे प्रशासकीय मान्यता देण्यासाठी पाठविलेले आहे.

२. अंदाजपत्रके संबंधित उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग व संबंधित कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, यांनी तयार केली असून संबंधित शाळांच्या मुख्याध्यापकांनी व प्रकल्प अधिका-यांनी अंदाजपत्रक व आराखडयास सहमती दर्शविली आहे.

३. सदर अंदाजपत्रके शासकीय आश्रमशाळा भिलमाळ व बोथी यांची अंदाजपत्रक सन २००७-०८ व भिलवाढ येथील शासकीय आश्रमशाळेचे अंदाजपत्रक सन २००८-०९ च्या दरसूचीवर आधारित आहेत. तथापि सदर कामे दुरुस्तीची असल्यामुळे अंदाजपत्रकात आकस्मिक खर्चासाठी असलेली रकमेची तरतूद वगळून अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक व अमरावती यांचे कार्यक्षेत्रातील उपरोक्त शाळांच्या दुरुस्तीच्या अंदाजपत्रकास रु.३३,५७,३३०/-(रुपये तेहतीस लाख सत्तावन्न हजार तीनशे तीस फक्त )

इतक्या रक्कमेस खाली दर्शविल्याप्रमाणे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. सदर दुरुस्तीचा खर्च सन २००९-१० साठी मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

| अ. क्र. | अपर आयुक्त | प्रकल्प | शासकीय आश्रम शाळा | तालुका | जिल्हा | अंदाज पत्रकीय रक्कम रुपये | शाळांच्या दुरुस्तीच्या कामाचा तपशील |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | नाशिक | नाशिक | भिलमाळ | त्र्यंबकेश्वर | नाशिक | ५००५८७ | सिमेंट/लोखंडी पत्रे बसविणे |
| | | | | | | ४९७०११ | जोत्याचे काम करणे, प्लींथसाठी पी.सी.सी. करणे |
| | | | | | | ४९४२१२ | स्नानगृह व शौचालय दुरुस्ती |
| | | कळवण | भिलवाड | सटाणा | नाशिक | ४८७८४९ | फरशी व छत दुरस्ती |
| | | | | | | ८५४३७१ | संरक्षक भिंतीची उंची वाढविणे |
| २ | अमरावती | किनवट | बोथी | कळमनुरी | हिंगोली | १७००७० | कर्मचारी निवासस्थानाची दुरुस्ती |
| | | | | | | २८७७८० | शिक्षक निवासस्थानाची दुरुस्ती |
| | | | | | | ६५४५० | किरकोळ दुरुस्ती |
| | | | एकूण | | | ३३५७३० | |

५. सदर शासन निर्णय शासन निर्णय वित्त विभाग क्र.विपअ- १००१/ प्र.क्र.४६/ २००१/विनियम, दि.११ जुलै, २००१ मधील भाग-पहिला, उपविभाग-पाच अनुक्रमांक-१ नियम १३४ अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

F:\BACKUP\D\2009\Coctruction Files\School RepairingsC.R.114

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यांत आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक **२००९०७०४१२४९१७००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

( ग. गो. पंचभाई )
शासनाचे सह सचिव

प्रति,
आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक (सोबत ३ मुळ अंदाजपत्रक)
अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक व अमरावती
प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, नाशिक/कळवण/किनवट
महालेखापाल (लेखा परिक्षा), (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
महालेखापाल (लेखा परिक्षा), (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, नागपूर.
जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक व अमरावती .
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम मालेगांव
कक्ष अधिकारी (का.७), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
निवड नस्ती (का.१३), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.